“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” अंतर्गत राज्य सांस्कृतिक निधीमध्ये रुपये ४५.०० कोटी जमा करण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शा. नि. क्र.: टिसीए-१६०५५(१२)१/२०२५(अर्थसंकल्प) -(ई. क्र. ९२७०५३)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ मार्च, २०२५

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय क्र.सांधोअ २०१०/प्र.क्र.८५/अर्थसं., दिनांक ०१ जुलै, २०१०
२) शासन निर्णय, क्र. मसांधो २०१०/रासानि २०११/प्र.क्र.१२२/अर्थसं. दिनांक ९ ऑगस्ट, २०१२
३) शासन निर्णय, क्र. मसांधो २०१०/रासानि २०११/प्र.क्र.१२२/अर्थसं. दिनांक ३० जानेवारी, २०१३
४) “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” अंतर्गत कोअर कमिटी दि. ११ मार्च, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त
५) शासन निर्णय क्रमांक: टिसीए-१६०५५(१२)४/२०२४- (अर्थसंकल्प) (ई. क्र. ९२७०५३) दिनांक १५ ऑक्टोबर, २०२४
६) शासन निर्णय क्रमांक: टिसीए-१६०५५(१२)१/२०२५- (अर्थसंकल्प) (ई. क्र. ९२७०५३) दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२५

**<u>प्रस्तावना</u> :-**

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त राज्य सांस्कृतिक धोरण २०१० जाहीर करण्यात आले आहे. सदर धोरणातील प्र.क्र.३ “अग्रक्रम” मधील मुद्दा क्र. २ नुसार राज्य सांस्कृतिक निधी स्थापन करण्यात यावा, असा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये “राज्य सांस्कृतिक निधीची” स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद केल्यानुसार या निधीचा विनियोग कोणत्या बाबींसाठी करावा, याबाबतची नियमावली संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये तयार करण्यात आली आहे.

राज्य सांस्कृतिक निधीमध्ये “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” अंतर्गत रु. १००.०० कोटी इतका निधी जमा ठेवून त्यावरील मिळणाऱ्या व्याजातून वेगवेगळे कार्यक्रम, उपक्रम आयोजित करण्यासाठी दिनांक ११ मार्च, २०२४ रोजीच्या कोअर कमिटीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन निर्णयानुसार रु. १००.०० कोटी इतका निधी जमा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्य सांस्कृतिक निधीमध्ये रु. ४५.०० कोटी इतका निधी जमा करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

या शासन निर्णयान्वये “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” अंतर्गत मा. मंत्री (सां.का.) यांच्या अध्यक्षतेखाली कोअर समितीने दिनांक ११ मार्च, २०२४ रोजीच्या बैठकीत राज्य सांस्कृतिक निधीसाठी मंजूर केलेल्या निधीपैकी रु. ४५,००,००,०००/- (रुपये पंचेचाळीस कोटी फक्त) इतका निधी “महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक निधी, मुंबई, मंत्रालय” या न्यासासाठी बँक ऑफ महाराष्ट्र या राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यात आलेल्या चालू खात्यात वर्ग करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर बॅकेचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| **बॅक खाते नाव** | **खाते क्रमांक** | IFSC कोड | **खाते प्रकार** |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक निधी | ६०१२७७७०७६३ | MAHB०००१३८८ | चालू खाते |

२. महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक निधीमध्ये सदर निधी जमा ठेवून त्यावरील मिळणाऱ्या व्याजातून वेगवेगळे कार्यक्रम / उपक्रम आयोजित करण्यात यावेत.

३. सदरचा खर्च मागणी क्र. झेड डी-२, २२०५ -कला व संस्कृती, ००, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम)(२२०५ ३७३३), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” अंतर्गत कोअर कमिटी दि. ११ मार्च, २०२४ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार तसेच नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४७/२०२५, का.-१४४३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०२५ व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७२/२०२५, व्यय-१५ दिनांक ११,मार्च, २०२५ रोजीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करकण्कयात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२५१७०२३४९०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.25 17:03:15 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव ( वित्त ) अथवा त्यांचा प्रतिनिधी ( सनियंत्रण समिती सदस्य)
३. अ. मु. स., सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक
४. उप सचिव (सां.का.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई (सनियंत्रण समिती सदस्य तथा नियंत्रण अधिकारी)
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय ( सनियंत्रण समितीचे सदस्य सचिव )
६. संचालक, पुरातत्व व वस्तूसंग्रहालय संचालनालय (सनियंत्रण समितीचे सदस्य सचिव)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता), मुंबई
८. लेखा व कोषाधिकारी, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या.१४४३), मंत्रालय, मुंबई
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (अर्थसं ११/व्यय-१५), मंत्रालय, मुंबई
१३.कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती, अर्थसंकल्प.